**नविन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या अनुषंगाने राज्य /क्षेत्रीय/जिल्हा/तालुका स्तरावरील कार्यवाहीबाबतचे वेळापत्रक**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र:- अभ्यास २०१५/प्र.क्र.६११/१५/विशि-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक:-१९ ऑक्टोबर, २०१५

**संदर्भ:**- १) भारत सरकार मानव संसाधन विकास मंत्रालय, यांचे D.O.NO.१३-४१/२०१४-JS(P) दि.२५ एप्रिल, २०१५
२) अभ्यास-२०१५ प्र.क्र.६११/विशि-३ दि.६ ऑक्टोबर, २०१५ चे परिपत्रक

**प्रस्तावना:-**

सन १९८६ मध्ये देशाच्या संर्वागीण विकासासाठी शैक्षणिक धोरण निश्चित करण्यात आले होते. सन १९९२ मध्ये सदर धोरणाचे नुतनीकरण करण्यात आले होते. परंतू २१ व्या शतकातील देशासमोरील व समाजापुढील आव्हाने लक्षात घेता देशाकरीता नविन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण निश्चित करणे गरजेचे झाले आहे. त्यानुषंगाने दि.२१ मार्च, २०१५ रोजी मा.केंद्रीय मंत्री, मानव संसाधन व विकास मंत्रालय, यांचे अध्यक्षतेखाली नविन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण निश्चित करण्यासाठी नवी दिल्ली येथे बैठकीचे आयोजन करण्यात आले होते. त्या बैठकीस देशातील विविध राज्यातील शिक्षण मंत्री, शिक्षण सचिव उपस्थित होते. त्यांनी देशाचे शैक्षणिक धोरण कशाप्राकरे निश्चित करण्यात यावे यासंदर्भात सूचना दिल्यात. धोरण निश्चितीकरीता देशातील प्रत्येक ग्रामपंचायत/ नागरी भागांचे मत मागविण्याकरीता एका सॉफ्टवेअरची निर्मिती करण्यात आली असून त्याचा वापर करून देशातील प्रत्येक स्थानिक स्वराज्य संस्थांचे मत संगणकाद्वारे एकत्र करण्यात येणार आहे. त्यासाठी राज्यातील उच्च शिक्षण विभागाने राज्यस्तर/ क्षेत्रीयस्तर/ जिल्हास्तर/ तालुकापातळीवर समन्वय अधिकाऱ्याची नेमणूक उपरोक्त संदर्भ क्र.२ नुसार करण्यात आली आहे. यानुषंगाने वेळापत्रकानुसार काटेकोरपणे कार्यवाही करण्याच्या व अनुषांगिक सूचना देणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

नविन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या अनुषंगाने उच्च तंत्र शिक्षण विभागाशी संबंधीत माहिती तालुका, जिल्हा, क्षेत्रीय व राज्यस्तरावरून संकलन करण्यासाठी संबंधीतांचे उदबोधन करणे, गट चर्चा घडवून आणणे, प्राप्त सूचनांचे संकलन करणे, व त्यातील नाविण्यपूर्ण, व्यवहार्य व सुसंगत सूचनांचे एकत्रिकरण करून उपलब्ध करून दिलेल्या संकेतस्थळावर भरणे इत्यादी कार्यवाही करावयाची आहे.

२. सदरहू कार्यवाही करण्यासाठी खालील वेळापत्रक देण्यात येत आहे त्याचे काटेकोर पालन करण्यात यावे.

| अ.क्र. | कार्यक्रम | दिनांक |
|---|---|---|
| १. | जिल्हा समन्वय अधिकाऱ्यांची राज्यस्तरीय कार्यशाळा | १९ ऑक्टोबर २०१५ |
| २. | तालुका स्तरीय समन्वयक अधिकाऱ्यांची जिल्हास्तरीय कार्यशाळा | २३ ऑक्टोबर २०१५ पर्यंत |
| ३. | तालुका स्तरावरील चर्चासत्रांचे आयोजन (Grassroots level consultation) | २३ ते ३० ऑक्टोबर |
| ४. | तालुका स्तरावरील सूचनांचे संकेतस्थळावर सादरीकरण | ३१ ऑक्टोबर २०१५ |
| ५. | जिल्हास्तरीय चर्चासत्रांचे आयोजन (District level consultation with stake holders) | २० ते ३० ऑक्टोबर |
| ६. | राज्यस्तरीय चर्चासत्राचे आयोजन (State level consultation with stake holders) | ३० ऑक्टोबर २०१५ |
| ७. | तालुका व जिल्हास्तरीय प्राप्त सुचनांचे विश्लेषण व एकत्रिकरण व संकेतस्थळावर सादरीकरणे | २ नोव्हेंबर, २०१५ |
| ८. | एकत्रित सूचनांना अंतिम स्वरूप देणे | ७ नोव्हेंबर, २०१५ |

३. तालुका स्तरीय चर्चासत्रांचे आयोजन करतांना नागरी भागातील (Urban Local) शिक्षण समित्यांचे पदाधिकारी नगरसेवक इत्यादींसमवेत चर्चा / विचारविनिमय (Consultation) करण्यात यावी.

४. जिल्हा स्तरीय चर्चासत्रांचे आयोजन करतांना संबंधीत जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, खासदार,आमदार, जिल्हा स्तरीय शिक्षण समित्यांचे पदाधिकारी, जिल्हा शिक्षण अधिकारी, मुख्याधिकारी अथवा त्यांचे प्रतिनिधी, निवडक महाविद्यालयांचे प्राचार्य इत्यादींसमवेत चर्चा / विचारविनिमय (Consultation) करण्यात यावे. जिल्हास्तरीय चर्चासत्रांचे आयोजन शक्यतोवर संबंधीत जिल्हाचे जिल्हाधिकारी यांचे मार्गदर्शनाखाली आयोजित करण्यात यावे.

५. राज्यस्तरावरील चर्चासत्रांचे आयोजन करतांना जिल्हास्तरावरील प्राप्त सूचनांचे सूचनांचे सुक्ष्म विश्लेषण करून राज्यस्तरावरील उच्च व तंत्र शिक्षण व अनुषांगिक सर्व विषयांशी संबंधीत सर्व घटकांच्या विचार विनिमयाअंती नविन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाबाबत राज्याच्या एकत्रीत सूचना तयार करण्यात याव्यात. अशास सर्व सूचना http://survey.mygov.in या संकेतस्थळावर लॉग इन करून भराव्यात.

६. तालुका, जिल्हा, राज्यस्तरावरील चर्चा/ सल्लामसलत/ विचारविनियम/(Consultation) करावयाच्या संबंधीत घटकांची (Stake holders) सूची सर्व साधारण खालीलप्रमाणे राहिल.

१) विद्यार्थी

२) शिक्षक

३) उच्च शिक्षणाशी संबंधीत शैक्षणिक संस्था

४) पालक

५) माजी विद्यार्थी

६) लोकप्रतिनिधी/माजी लोकप्रतिनिधी

७) शैक्षणिक क्षेत्राशी संबंधीत स्थानिक समितीचे अध्यक्ष/सदस्य

८) सामाजिक/राजकिय/शैक्षणिक/सांस्कृतिक/क्रीडा/ औद्योगिक इत्यादी

क्षेत्रातील जानकार व उच्च व तंत्र शिक्षण विषयात रूची बाळगणारे स्थानिकइत्यादी घटकांचा समावेश चर्चासत्रात करावा.

७. उच्च व तंत्र शिक्षण विषयाशी संबंधीत २० विषयांशी संबंधीत मुद्दयांवर चर्चासत्राचे आयोजन केल्यानंतर व समन्वय अधिकारी यांनी प्रास्ताविक केल्यानंतर उपस्थित Stake Holder मधून आवश्यकतेनुसार (५ किंवा जास्त ) ग्रूप तयार करून चर्चा करण्यात यावी, व त्यानंतर विषयनिहाय एकत्रित सूचना उपलब्ध करून देण्यात आलेल्या http://survey.mygov.in या संकेतस्थळावर लॉग इन करून भराव्यात.

चर्चेअंती सूचविण्यात येणाऱ्या सूचना या नाविण्यपूर्ण, व्यवहार्य व सुसंगत असाव्यात.

८. तरी, उपरोक्त नमुद वेळापत्रकाचे काटेकोर पालन करण्यात यावे व तालुका, जिल्हा व राज्यस्तरावरील सर्व संबंधीत घटकांशी (Stake holder) चर्चा/ सल्लामसलम/विचारविनिमय (Consultation) करून आपल्या सूचना http://survey.mygov.in या संकेतस्थळावर लॉग इन करून भराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१०१९१६३८५५६८०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Rambhau Kharat

Digitally signed by Siddharth Rambhau Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Rambhau Kharat
Date: 2015.10.21 11:09:54 +05'30'

**(सिध्दार्थ खरात)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा.मंत्री (उ.व तं.शि) यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री (उ.व तं.शि) यांचे खाजगी सचिव
३) मा.प्रधान सचिव (उ.व तं.शि) यांचे स्वीय सहाय्यक
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६) संचालक, कला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) सर्व सह संचालक, उच्च शिक्षण, (आपणास कळविण्यात येते की, संबंधीत सर्व जिल्हाधिकारी यांचेशी संपर्क करावा व जिल्हास्तरीय सर्व संबंधीत stake holders चा सहभाग राहिल याची दक्षता घ्यावी.)
८) सर्व जिल्हाधिकारी, (आपणास विनंती करण्यात येते की, या कार्यक्रमासाठी जिल्हास्तरीय सर्व संबंधीत stake holders उपस्थित राहतील याची खातरजमा करावी.)
९) सर्व संबंधीत जिल्हा व तालुका समन्वय अधिकारी (सह संचालक, उच्च शिक्षण व संबंधीत जिल्हा समन्वय यांच्या मार्फत आवश्यक त्या कार्यवाहीसाठी.)